**महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ (राज्यस्तर)(कार्यक्रम) योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- ०१२३/प्र.क्र. ०८/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०९ मार्च, २०२३

**संदर्भ** :- १. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र. क्र.१५७/२-स, दि २७.१२.२०१९.
२. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दिनांक ०८.०२.२०२३.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र. कृषीपत-८/मजोफुशेकयो/निधी मागणी/२०२३/२२, दिनांक २०.०१.२०२३.

**प्रस्तावना -:**

सन २०१५-१६ ते २०१८-१९ या सलग चार वर्षात राज्यातील विविध भागात दुष्काळसदृष्य परिस्थिती निर्माण झाल्यामुळे मोठ्या प्रमाणात ५० पैसेपेक्षा कमी पैसेवारी जाहिर करण्यात आली होती. तसेच राज्यात अवेळी पाऊस झाल्यामुळे शेतकऱ्यांचे मोठ्या प्रमाणावर नुकसान झाले होते. या नैसर्गिक आपत्तीच्या पार्श्वभूमीवर शेतकऱ्यांचे नुकसान झाल्यामुळे काही वर्षात शेती निगडीत कर्जाची मुदतीत परतफेड होऊ शकली नाही. परिणामी शेतकरी थकबाकीदार झाल्यामुळे कर्जाच्या दृष्टचक्रात अडकलेला आहे आणि त्यांना शेती कामांकरीता नव्याने पीक कर्ज घेण्यास अडचणी निर्माण झाल्या आहेत. शेतकऱ्यांना कर्जाच्या दुष्टचक्रातून बाहेर काढून चिंतामुक्त करण्यासाठी "महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९" जाहीर करण्यात आली असून याबाबत संदर्भ क्र. १ अन्वये कर्जमुक्ती योजनेचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी आतापर्यंत रु. २०४७२.७५ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संदर्भ क्रमांक ३ दिनांक २०.०१.२०२३ च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या मागणीनुसार उर्वरीत पात्र लाभार्थ्यांना कर्जमाफीचा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाकडील कार्यक्रम खर्चाच्या योजनेअंतर्गत मंजूर निधीपैकी रु. १४०.७० कोटी (रु. एकशे चाळीस कोटी सत्तर लाख फक्त) एवढा निधी महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ (राज्यस्तर)(कार्यक्रम), (२४३५ ०१४२) या लेखाशिर्षाअंतर्गत ३३ अर्थसहाय्य या बाबी साठी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे.

सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

३. सदर खर्च मागणी क्रमांक व्ही-०२, २४३५-इतर कृषीविषयक कार्यक्रम ६०-इतर, १०१ शेतकऱ्यांसाठी कर्जमाफी योजना, (००) (०३) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ (२४३५ ०१४२), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०२२-२३ या वित्तीय वर्षांअंतर्गत उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८/का. १४३१, दिनांक ०९.०२.२०२३ अन्वये तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२१/२०२३/व्यय-२, दिनांक ०१.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३०९१२०३४७५४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SUNIL LAXMANRAO KATHOLE

Digitally signed by SUNIL LAXMANRAO KATHOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=28a37fe1ff3e4e025e695251dc7073be0c55927dfde2440021496777c190c146, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2CB6E9BA02DFC9C368A0DFE373A6877AD6CAD79F1363D85E0435EA61D33C752, cn=SUNIL LAXMANRAO KATHOLE
Date: 2023.03.09 12:08:08 +05'30'

**( सु. ल. काठोळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत,**

१)) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-२, मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.

५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.

६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).

७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).

९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग (का. १४३१), मंत्रालय, मुंबई.

१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती (कार्यासन २-स).